**१% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणा-या रकमा संबंधित महानगरपालिकांना वितरीत करण्याबाबत....**
**माहे जुलै २०१६ ते सप्टेंबर २०१६**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः स्थासंक-२०१६/प.क्र. ४५/नवि-३२**

मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: ०१ डिसेंबर ,२०१६

**वाचा :-**

**१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि. २०.०४.२०१६**
**२) शासन निर्णय क्र. : स्थासंक-२०१५/प्र.क्र.३५/नवि-३२ दि.१६ मे २०१६**
**३) शासन निर्णय क्र. : स्थासंक-२०१५/प्र.क्र.४५/नवि-३२ दि.३० सप्टेंबर २०१६**
**४) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र, राज्य पुणे यांचे पत्र क्र.७/नोंमनि/LBT/९८३/२०१६ दिनांक १०.११.२०१६**

**प्रस्तावना :-**

महानगरपालिकांना १% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणाऱ्या रक्कमा वितरीत करण्यासाठी सन २०१६ -२०१७ च्या अर्थसंकल्पामध्ये रु.१०००.०० कोटीची तरतूद मंजूर करण्यात आली आहे. वित्त विभागाने ८०% च्या मर्यादेत रू. ८००.०० कोटी इतकी रक्कम अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करून दिली आहे. या तरतूदीमधून नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक निरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दिनांक **०९.०५.२०१६** च्या पत्रान्वये माहे जानेवारी, फेब्रुवारी व मार्च २०१६ ची २५ महानगरपालिकांची वितरीत करण्याची एकुण रक्कम रु. **२४९.८९** कोटी. तसेच ऑक्टोंबर ते डिसेंबर २०१५ ची थकबाकी **रु.२४.५८** अशी एकुण **रु.२६०.६१** कोटी सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पिय तरतूदती मधून संबंधित महानगरपालिकांना वितरीत करण्यात आली आहे. तसेच चालू आर्थिक वर्षामधील माहे एप्रिल, मे, जून २०१६ मधील रक्कम रु. २१६.०४ संबंधित महानगरपालिकांना ३० सप्टेंबर २०१६ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली आहे.

२. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक निरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी माहे जुलै १६ ते सप्टेंबर २०१६ या तिमाहीसाठी २५ महानगरपालिकांना मुद्रांक शुल्क अधिकभाराची वितरीत करण्याची एकुण रक्कम रु. २०४७१४३०२८.०० इतकी असल्याचे संदर्भीय क्रमांक ४ येथील दि. १०.११.२०१६ च्या पत्रान्वये कळविले आहे.

३. सन २०१६-१७ करीता २५ महानगरपालिकांना १% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणाऱ्या रक्कमा वितरीत करण्यासाठी अर्थसंकल्पामध्ये रु.१०००.०० कोटीची तरतूद मंजूर करण्यात आली आहे. वित्त विभागाने ८०% च्या मर्यादेत रू. ८००.०० कोटी इतकी रक्कम अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करून दिली आहे. त्यामधून आतापर्यंत रु. २६०.६१ + २१६.०४ = ४७६.६५ कोटी वितरीत केले आहेत. आता संबंधित महानगरपालिकांची जुलै २०१६ ते सप्टेंबर २०१६ या तिमाही मधील एकुण रक्कम रु.१९८.९३ कोटी थकीत रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

१% मुद्रांक शुल्कापोटी महानगरपालिकांची जूलै २०१६ ते सप्टेंबर २०१६ या तिमाहीची अवितरीत रक्कम रु.२०४.७१ कोटी मधून महाराष्ट्र जिवन प्राधिकरणास देण्यात आलेली रु.५.७७ कोटीची रक्कम वजा करुन महानगरपालिकांना १% मुद्रांक शुल्कापोटी रू. **१९८,९३,५३,२९६/-** (अक्षरी रूपये एकशे अठ्याण्णव कोटी त्र्याण्णव लाख त्रेपण्ण हजार दोनशे शहाण्णव फक्त) खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | महानगर पालिकेचे नाव | जुलै, ऑगस्ट व सप्टेंबर २०१६ एकुण देय रक्कम | महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देण्यात आलेली व मनपाकडून वसुल रक्कम रू. कोटीत | कपातीनंतर एकुण देय रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ठाणे | २५१५९०६३९ | ० | २५१५९०६३९ |
| २ | नवी मुंबई | १२१२०८७४९ | ० | १२१२०८७४९ |
| ३ | मीरा भाईंदर | १२०४९११५२ | ० | १२०४९११५२ |
| ४ | कल्याण डोंबीवली | १५४४२२०९० | ० | १५४४२२०९० |
| ५ | भिवंडी-निजामपूर | १७९८००९३ | ० | १७९८००९३ |
| ६ | वसई-विरार | १३९८२०३४९ | ० | १३९८२०३४९ |
| ७ | उल्हासनगर | १२६२३८७१ | ० | १२६२३८७१ |
| ८ | पुणे | ५००८२९५०३ | ० | ५००८२९५०३ |
| ९ | पिंपरी-चिंचवड | २७४३८४३५७ | ० | २७४३८४३५७ |
| १० | सांगली-मिरज-कुपवाड | १४४७४८२१ | ० | १४४७४८२१ |
| ११ | कोल्हापूर | २३२२११२३ | ० | २३२२११२३ |
| १२ | सोलापूर | २०६४८७७३ | ० | २०६४८७७३ |
| १३ | नाशिक | ११५३१०३७९ | ० | ११५३१०३७९ |
| १४ | मालेगांव | १७६१३९२२ | १०९६८१३८ | ६६४५७८४ |
| १५ | अहमदनगर | १६८४५०७१ | १६८४५०७१ | ० |
| १६ | जळगांव | १५३२५३४० | ० | १५३२५३४० |
| १७ | धुळे | ५०९५४२० | ५०९५४२० | ० |
| १८ | औरंगाबाद | ४१८५७१४६ | ० | ४१८५७१४६ |
| १९ | लातुर | ७०९१६७५ | ७०९१६७५ | ० |
| २० | नांदेड | १२०२१९५० | ० | १२०२१९५० |
| २१ | परभणी | २९५२८१० | २९५२८१० | ० |
| २२ | अमरावती | १८९२४८९५ | ० | १८९२४८९५ |
| २३ | अकोला | १०९८६५६० | १०९८६५६० | ० |
| २४ | नागपूर | १२७५७२२८२ | ० | १२७५७२२८२ |
| २५ | चंद्रपूर | ३८५००५८ | ३८५००५८ | ० |
|  | एकूण- | २०४७१४३०२८ | ५७७८९७३२ | १९८९३५३२९६ |

०२. सदर अनुदान उपरोल्लोखित महानगरपालिकांना वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी सदर अनुदान कोषागारातून आहरण करून संबंधित महानगरपालिकांना तात्काळ वितरीत करावे.

०३. याकरीता होणारा खर्च "( मागणी क्रमांक एफ-४, ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १०२, मुद्रांक शुल्क (०१) जकात रद्द केल्यामुळे मुद्रांक शुल्काचे अभिहस्तांकन (०१)(०१) स्थानिक संस्था करांऐवजी जकातीचे पुन:स्थापन केल्यामुळे महानगरपालिका क्षेत्रामधील मुद्रांक शुल्कावरील १ टक्के अधिभार महानगरपालिकेसाठी देण्याच्या दृष्टिने (३६०४०९२४) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४. सदर १% अधिभारापोटी जमा रकमेचा तसेच त्यापोटी वितरीत करण्यात येणाऱ्या या सहायक अनुदानावरील खर्चाचा हिशोब संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी स्वतंत्रपणे ठेवावा व याबाबतचे लेखे व तत्संबंधी सर्व कागदपत्रे महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना, आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावीत.

०५. प्रमाणित करण्यात येते की, शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि. २०. ०४. २०१६ मधील सर्व अटी व शर्तींची या संदर्भात पूर्तता होत असून सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २०.०४.२०१६ च्या शासन निर्णय क्रमांक अन्वये अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ अन्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०६ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेस्तळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक. २०१६१२०११५२७००४६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2016.12.01 15:32:38 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संबंधित जिल्हाधिकारी.
२. आयुक्त संबंधित महानगरपालिका.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (मुंबई/नागपूर)
४. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा कोषागार अधिकारी.
७. नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पुणे.
८. वित्त विभाग व्यय-३/अर्थोपाय/अर्थ-१६,मंत्रालय,मुंबई.
०९. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव.
११. कार्यासन अधिकारी नवि-४, मंत्रालय,